**पोलीस दलामध्ये रजेचे रोखीकरण पुन्हा सुरु करण्याबाबत.**

गृह विभाग,
महाराष्ट्र शासन,
शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-२००२/प्र.क्र.५६४/पोल-५(ब),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक- २७ फेब्रुवारी, २००४.

**वाचा :**-पोलीस महासंचालक यांचे पत्र क्र-पोमसं/६/४६-ई/संकीर्ण/अर्जित रजा/प्रत्यार्पण/२००४, दि.३१.०१.२००४.

**प्रस्तावना :-** पोलीस कर्मचारी/अधिकारी यांच्या कामाचे स्वरुप इतर शासकीय कर्मचारी/अधिकारी यांच्या पेक्षा वेगळे आहे. सणाच्या दिवशी इतर कर्मचा-यांना सार्वजनिक सुटी असते त्यावेळी मात्र पोलीस कर्मचा-यास अशा सुटया उपभोगता येत नाहीत. उलट त्या दिवशी त्यांना दिवसभर बंदोबस्तासाठी कामावर हजर रहावे लागते. पोलीस दलात अपुरे मनुष्यबळ असल्यामुळे पोलीस कर्मचा-यास १२ ते १४ तास सतत नोकरी करावी लागते. कायदा व सुव्यवस्थेच्या प्रश्नामुळे पोलीस कर्मचा-यांना इतर कर्मचा-यांप्रमाणे नियमित रजा घेता येत नाही किंवा काही वेळा त्यांना मंजूर केलेली रजा उपभोगत असताना कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न उपस्थित झाल्यास रजा अर्ध्यावर सोडून कामावर हजर रहावे लागते. अन्य कर्मचा-यांपेक्षा पोलीसांवरील कामाची जबाबदारी व कामाचे स्वरुप विचारात घेऊन पोलीस शिपाई ते पोलीस निरीक्षक पदावरील कर्मचा-यांसाठी १५ दिवसाच्या अर्जित रजेचे रोखीकरण पुन्हा सुरु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता व त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-** वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक १५ जानेवारी, २००१ अन्वये म. ना. से. (रजा) नियम-१९८१ मधील नियम-७३ ची अर्जित रजा प्रत्यार्पित करण्याची मूळ तरतूद दिनांक-१.२.२००१ पासून वगळण्यात आली आहे, त्यास अपवाद करुन पोलीस दलातील शिपाई ते पोलीस निरीक्षक पदापर्यंतच्या कर्मचा-यांसाठी एका वित्तीय वर्षात १५ दिवासांच्या अर्जित रजेच्या प्रत्यार्पणास शासन मंजूरी देत आहे.

सदर खर्च " २०५५-पोलीस-१०९ जिल्हा पोलीस-(००) (०१) जिल्हा पोलीस दल-वेतन" व "२०५५-पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस-(०२) शहर पोलीस (०२) (०१) आस्थापना " या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर आदेश वित्त विभागाच्याअनौपचारिक संदर्भ. क्रमांक-८०/०४/सेवा-८, दिनांक-२५फेब्रुवारी, २००४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

( ना. रा. शेरे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधीक्षक,
महालेखापाल, महारज्राष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
निवड नस्ती